महाराष्ट्र घरेलू कामगार कल्याण मंडळाअंतर्गत राज्यातील नोंदणीकृत घरेलू कामगारांना मंडळाच्या निधीतून द्यावयाच्या आर्थिक सहाय्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## उद्योग, उर्जा व कामगार विभाग

## शासन निर्णय क्रमांकः घरेलू-२०१४/प्र.क्र.६७/कामगार ७ अ,

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
तारीख: ८ ऑगस्ट, २०१४

वाचा -

१) महाराष्ट्र घरेलू कामगार कल्याण मंडळ अधिनियम,२००८.
२) महाराष्ट्र घरेलू कामगार कल्याण मंडळ (सल्लागार समिती) नियम,२००९.
३) महाराष्ट्र घरेलू कामगार कल्याण मंडळ नियम,२०१०.
४) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.घरेलू-२०१४/प्र.क्र.६७/कामगार ७ अ, दिनांक ७.६.२०१४.
५) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन शुध्दीपत्रक क्र.घरेलू-२०१४/प्र.क्र.६७/कामगार-७ अ, दिनांक १८.६.२०१४.

प्रस्तावना -

दिनांक १८.६.२०१४ च्या शासन शुध्दीपत्रकान्वये दिनांक १.७.२०१४ रोजी वयाची ५५ वर्षे पूर्ण केलेल्या नोंदीत घरेलू कामगारांनाही सन्मानधन योजनेचा लाभ देण्यात यावा व याची अंमबजावणी युध्दपातळीवर विशेष मोहीम राबवून दिनांक १५.७.२०१४ पर्यंत पूर्ण करण्यात यावी, अशा सूचना देण्यात आल्या आहेत.

महाराष्ट्र घरेलू कामगार कल्याण मंडळाच्या अलिकडेच दिनांक २५.७.२०१४ रोजी झालेल्या बैठकीत पारित झालेल्या ठराव क्रमांक १० नुसार दिनांक ३१ जुलै, २०१४ पर्यंत मंडळात नोंदीत झालेल्या व वयाची ५५ वर्षे पूर्ण झालेल्या घरेलू कामगारांनाही सन्मानधन योजनेचा लाभ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरुन शासनाने पुढील निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय-**

महाराष्ट्र घरेलू कामगार कल्याण मंडळातर्फे आजमितीस केवळ दिनांक १ जुलै,२०१४ रोजी वयाची ५५ वर्षे पूर्ण केलेल्या नोंदीत घरेलू कामगारांनाच सन्मानधन योजने अंतर्गत रुपये १०,०००/- एवढी रक्कम त्यांच्या बँक खात्यात जमा करण्याचे काम युध्दपातळीवरुन करण्याचे चालू आहे. त्यामध्ये आता वाढ करण्यात येत असून शासनाने असा निर्णय घेतलेला आहे की, आता दिनांक ३१ जुलै,२०१४ पर्यंत वयाची ५५ वर्षे पूर्ण केलेल्या मंडळाच्या नोंदीत घरेलू कामगारांनाही सन्मानधन योजनेचा लाभ देण्यात यावा व याची अंमलबजावणी युध्दपातळीवर विशेष मोहीम राबवून दिनांक ३१.८.२०१४ पर्यंत पूर्ण करण्यात यावी.

महाराष्ट्र घरेलू कामगार कल्याण मंडळ अधिनियम,२००८ च्या कलम क्रमांक २२ अन्वये प्राप्त झालेल्या अधिकारानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८११११६४४५४०११० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUNIL DATTATRAY SAHSRABUDHE

Digitally signed by SUNIL DATTATRAY SAHSRABUDHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRY ENERGY AND LABOUR DEPT,CID - 917084, postalCode=400032, st=Maharashtra, cn=SUNIL DATTATRAY SAHSRABUDHE
Date: 2014.08.20 17:57:48 +05'30'

**(सु. द. सहस्त्रबुध्दे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रती,

१. कामगार आयुक्त तथा सदस्य सचिव, महाराष्ट्र घरेलू कामगार कल्याण मंडळ, मुंबई.
२. समितीचे सर्व सदस्य (द्वारा कामगार आयुक्त).
३. कामगार उपायुक्त (घरेलू कामगार विषयाशी संबंधित), मुंबई.
४. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा व लेखा अनुज्ञेयता), मुंबई.
५. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा परीक्षा व लेखा अनुज्ञेयता), नागपूर.
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
७. अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे (पूर्व) मुंबई-५१.
८. स्वीय सहाय्यक, मा. मंत्री (कामगार) यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई
९. स्वीय सहाय्यक, मा. राज्यमंत्री (कामगार) यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई
१०. स्वीय सहाय्यक, प्रधान सचिव (कामगार) यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई
११. निवडनस्ती (कामगार ७अ).